**महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ मर्या., मुंबई या महामंडळास सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात ३६-सहायक अनुदाने (वेतन) अंतर्गत अनुदान वितरीत करणेबाबत (अनिवार्य) (Unconditional)**

**महाराष्ट्र शासन**
**दिव्यांग कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : दिविम-२०२४/प्र.क्र.६२/दिव्यांग कल्याण-३**
३१,३२,३५ ए, तिसरा मजला, ए-विंग, मित्तल टॉवर,
नरीमन पॉईंट,मुंबई - ४०० ०२१.
दिनांक :- ०४ मार्च, २०२५

**वाचा:**
१. वित्त विभाग, शा.नि.क्र. मुंविनि-२०२२/प्र.क्र.२४/२०२२/विनियम, दि.१२.०१.२०२३.,
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१२.०२.२०२५.,
३. दिव्यांग कल्याण, शा.नि.क्र.दिविम-२०२४/प्र.क्र.६२/दि.क.३, दि. ०३.०७.२०२४.,
४. दिव्यांग कल्याण, शा.नि.क्र.दिविम-२०२४/प्र.क्र.६२/दि.क.३, दि. ३०.०९.२०२४.,
५. दिव्यांग कल्याण, शा.नि.क्र.दिविम-२०२४/प्र.क्र.६२/दि.क.३, दि. २३.०१.२०२५.,
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ मर्या., मुंबई यांचे दिनांक २१.०२.२०२५ चे पत्र.

**प्रस्तावना:-**

राज्यातील दिव्यांगांना स्वयंरोजगारासाठी कर्ज स्वरुपात अर्थसहाय्य करण्याचे कार्य महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळाकडून करण्यात येते. कर्ज वितरणासोबतच दिव्यांगांच्या सर्वांगिण विकासाच्या दृष्टीने विविध योजनाही महामंडळामार्फत राबविण्यात येतात. महामंडळास सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता व्यवस्थापन व प्रशासकीय खर्च भागविण्यासाठी मागणी क्र. झेडआय-३, (२२३५ D३६४) (अनिवार्य) या लेखाशीर्षाखाली ३६-सहायक अनुदाने (वेतन) याअंतर्गत रुपये ९५,६४,०००/- (अक्षरी रुपये पंच्याण्णव लक्ष चौसष्ट हजार रुपये फक्त) इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ मर्या., मुंबई यांनी उपरोक्त संदर्भ क्र. ६ च्या पत्रान्वये महामंडळाला ३६-सहायक अनुदाने (वेतन) या बाबीकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून निधी वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. त्यानुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ मर्या., मुंबई यांच्यामार्फत राज्यातील दिव्यांगाना रोजगार व स्वयंरोजगारासाठी कर्ज स्वरुपात अर्थसहाय्य करण्यासंबंधी विविध योजना राबविण्यात येतात. संदर्भ क्र.२ येथील शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पिय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळास सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्र.

झेडआय-३, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण (अनिवार्य) (२२३५ D३६४) या लेखाशीर्षाखाली योजनेंतर्गत ३६-सहायक अनुदाने (वेतन) या बाबीसाठी अर्थसंकल्पित तरतूदीच्या प्रमाणात उपलब्ध करुन दिलेला रुपये १४,००,०००/- (अक्षरी रुपये चौदा लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे. याबाबतचा सविस्तर तपशील पुढीलप्रमाणे दर्शविण्यात आला आहे.

**(रुपये हजारात)**

| अ.क्र. | अनिवार्य योजनेचे नाव | लेखाशीर्ष व उद्दीष्ट | सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता करण्यात आलेली अर्थसंकल्पिय तरतूद | यापूर्वी वितरीत करण्यात आलेला निधी | सन २०२४-२५ करीता विभागाकडून वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| १ | मागणी क्र.झेडआय-३, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०८-दिव्यांग कल्याण संस्थांना अनुदाने | २२३५D३६४ ३६-सहायक अनुदाने (वेतन) | ९५६४ | ७३९० | १४०० |

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी अधिदान व लेखा कार्यालयातून आहरित करण्यापुर्वी वित्त विभागाच्या दिनांक २५.०७.२०२४ व दिनांक १२.०२.२०२५ रोजीच्या परिपत्रकामध्ये नमूद मार्गदर्शक सूचना व परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील मार्गदर्शक सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

२) महामंडळाला योजना/योजनेतर आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधित अनिवार्य योजनेतील अनुज्ञेय बाबींसाठीच खर्च करावा.

३) व्यवस्थापनावरील खर्च मर्यादित ठेवण्याच्या दृष्टीने कामकाजात सुसूत्रता आणावी.

४) विविध बाबींवर खर्च केलेल्या रकमांची तपशीलवार माहिती, त्यावर केलेला खर्च याचबरोबर मागील वर्षातील अखर्चित निधी याबाबतची माहिती शासनास तात्काळ सादर करावी.

५) महामंडळाने वितरीत केलेल्या कर्जाच्या वसुलीचे प्रमाण प्रभावीपणे राबविण्यासाठी सर्वोतोपरी प्रयत्न करावेत.

६) केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये. कार्यालयीन खर्चात काटकसर करावी.

७) निधी खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली व अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व अटी/शर्ती तसेच CVC मार्गदर्शक सूचना, CAG निरीक्षणे इ.अनुपालन करुन निधीचा विनियोग करावा.

३. या व्यवस्थापकीय अनुदानाबाबत उप सचिव (अर्थसंकल्प), दिव्यांग कल्याण-२, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी राहतील. सदर अनुदानाची रक्कम पुढील कार्यवाहीकरीता आहरण व संवितरण अधिकारी, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे सुपुर्द करण्यात येत आहे. **वित्त विभाग, शा.नि.क्र. मुंविनि-२०२२/प्र.क्र.२४/२०२२/विनियम, दि. १२.०१.२०२३ नुसार सदरचे अनुदान हे बिनशर्त आहे.** त्यांना सदर अनुदान म.को.नि.४४(अ) मधील नमुन्यातील देयकान्वये महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ यांस संवितरीत करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत.

४. या बाबींवरील खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा:-

**मागणी क्रमांक झेडआय-३,**
**२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण,**
**०२ समाज कल्याण,**
**१०१ अपंगाचे कल्याण,**
**(०८) दिव्यांग कल्याण संस्थांना अनुदाने,**
**(०८) (०१) महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळास व्यवस्थापकीय अनुदान (अनिवार्य) (२२३५ D३६४)**
**३६, सहायक अनुदाने (वेतन)**

५. सदर आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५.०७.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे. याबाबत वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेली मार्गदर्शक तत्त्वे / शासन निर्णय / शासन परिपत्रक यामधील सूचनांचे पालन करणे आवश्यक राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३०४१२३०२४४५३५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ADHIKRAO BAPU BUDHE

Digitally signed by ADHIKRAO BAPU BUDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PERSONS WITH DISABILITIES WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=e9b3afc989167fcd7f4487809755a2a08c37958a70b01ce9dd6139bffb1e6896, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6DD8309934E3A186F9E32AB2ED268A322FA2805ECBD838D076066AA8F4668BC0, cn=ADHIKRAO BAPU BUDHE
Date: 2025.03.04 12:31:40 +05'30'

**( अधिकराव बा. बुधे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.,
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ मर्या.,मुंबई.,
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.,
४) उप सचिव (दिव्यांग कल्याण-२), दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.,
५) आहरण व संवितरण अधिकारी, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.,
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.,

७)जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई/ठाणे.,

८)निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.,

९) कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१४/अर्थोपाय/अर्थसंकल्प/साउ), मंत्रालय, मुंबई.,

१०) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई.,

११) अवर सचिव/कक्ष अधिकारी, कार्यासन-दि.क.२, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.,

१२) निवड नस्ती/दिव्यांग कल्याण-३.

*****